**नक्षलग्रस्त भागात विशेष कृती दलामध्ये कार्यरत अधिकारी / कर्मचारी यांना दरमहा रु.१०००/- प्रमाणे कमांडो भत्ता मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एनएएक्स ०३१६/प्र.क्र. ७७/वि.शा.१ ब**
२ रा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०२ जून, २०१७.

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांक - एपीओ ३६०५/प्र.क्र.३ (अ) /पोल-३, दिनांक १७.०२.२००६,

२) शासन निर्णय क्रमांक - एनएएक्स ०८१३/प्र.क्र.३६०/वि.शा.१ ब, दिनांक १४ मे,२०१४.

३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्रमांक - पोमसं/वि.कृ.दल/कमांडो भत्ता मंजूरी/४७-२०१६, दिनांक ०३.१२.२०१६ चे पत्र.

**प्रस्तावना -**

नक्षलवाद्यांच्या अतिरेकी व हिंसक कारवायांचा समूळ नायनाट करणे व त्यावर नियंत्रण ठेवण्यासाठी सन-२००६ मध्ये विशेष कृती दलाची निमिर्ती संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. वास्तविकरित्या नक्षलग्रस्त भागामध्ये कार्यरत असलेल्या सी-६० पथकातील अधिकारी/कर्मचारी व विशेष कृती दलातील अधिकारी/कर्मचारी यांच्या कामाचे स्वरुप एकसारखे आहे. सी-६० पथकातील अधिकारी/कर्मचारी यांना सध्या मासिक कमांडो भत्ता रुपये ४,०००/- देण्यात येत आहे. तर विशेष कृती दलातील अधिकारी/कर्मचारी यांना सध्या दैनिक भत्ता प्रतिदिन रुपये १००/- प्रमाणे ३० दिवसासाठी रुपये ३,०००/- देण्यात येत आहे. नक्षलग्रस्त भागामध्ये कार्यरत असलेल्या सी-६० पथकातील अधिकारी/कर्मचारी व विशेष कृती दलातील अधिकारी/कर्मचारी यांना देण्यात येत असलेल्या भत्त्यामध्ये येत असलेली रुपये १,०००/- इतकी तफावत दूर करण्याबाबतचा प्रस्ताव पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संदर्भाधीन क्रमांक ३ च्या पत्रान्वये शासनास पाठविला होता. त्यानुसार नक्षलग्रस्त भागात विशेष कृती दलामध्ये कार्यरत अधिकारी / कर्मचारी यांना कमांडो भत्ता मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राज्यातील नक्षलग्रस्त भागातील विशेष कृती दलामध्ये कार्यरत अधिकारी / कर्मचारी यांना या शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून प्रत्येकी दरमहा रु.१०००/- (अक्षरी रुपये एक हजार मात्र) एवढा कमांडो भत्ता देण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) या प्रयोजनार्थ होणारा खर्च "मागणी क्रमांक बी-१, २०५५ पोलीस- (००) (१०९) जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस बल, २०५५ ०१६८, ०१ वेतन " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

२) हा शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.९२/२०१७/व्यय-७, दिनांक २६.०४.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०२१४४६१९०८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay D Patil

Digitally signed by Vijay D Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5254aa09c72b0eb445f264826ab10bb42793fc26e3838113296e7ff812051f6f, cn=Vijay D Patil
Date: 2017.06.02 14:50:32 +05'30'

**( विजय पाटील )**
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. विशेष पोलीस महानिरीक्षक (नक्षलविरोधी अभियान), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. पोलीस उप महानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र, नागपूर.
५. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली / चंद्रपूर / भंडारा / गोंदिया / यवतमाळ / नांदेड.
८. वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
९. पोलीस अधिक्षक, नागपूर / गडचिरोली / चंद्रपूर / भंडारा / गोंदिया / यवतमाळ / नांदेड.
१०. गृह विभागातील सर्व कार्यासने
११. निवडनस्ती (वि.शा.१ ब)